**बँक खात्यातील अखर्चित रकमा शासन खाती जमा करण्याच्या अनुषंगाने स्पष्टीकरण.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण- २०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २८ मे, २०२०

**<u>वाचा</u>:- १. शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण- २०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५ दि. २६ मे, २०२०**
**२. शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- १०.०२/प्र.क्र. १२८/अर्थोपाय, दि. ०६ जून, २००८**

**शासन परिपत्रक :-**

उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये शासकीय कार्यालये, संस्था, महामंडळे व सार्वजनिक उपक्रम यांच्या बँक खात्यातील दिनांक ३१ डिसेंबर, २०१९ पूर्वी प्राप्त झालेल्या रकमांपैकी अखर्चित असलेला निधी शासन खाती जमा करण्याच्या सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्या अनुषंगाने काही मुद्द्यांवर खालील प्रमाणे अधिक स्पष्टता करण्यात येत आहे.

१. **ठेव स्वरुपात गुंतवलेल्या रक्कमांबाबत**

काही महामंडळे, संस्था यांनी त्यांच्याकडील अतिरिक्त शिल्लक रक्कम ठराविक मुदतीसाठी ठेव स्वरुपात गुंतवली असण्याची शक्यता आहे. अशा प्रकरणी संबंधितांकडून त्यांनी गुंतविलेल्या ठेव रकमेचा तपशील **( नमुना सोबत जोडला आहे.)** आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्राप्त करुन घ्यावा व देयकासोबत कोषागारास सादर करावा. तसेच “ठेव मुदत संपल्यानंतर प्राप्त होणारी सर्व रक्कम (मुद्दल अधिक व्याज) शासन खाती जमा करण्यात येईल.” असे हमीपत्र आहरण व संवितरण अधिकारी यांनी दयावे. अशा शासनास परत करावयाच्या रकमेत त्यांच्या स्वनिधीचा समावेश असणार नाही. म्हणजेच केवळ अखर्चीत शासकीय निधी व त्यावरील प्राप्त व्याज शासनास परत करावे लागेल. यासंबंधी आवश्यक ते हमीपत्र संबंधितांकडून घेवून आहरण व संवितरण अधिकारी यांनी स्वत: कडील अभिलेख्यात ठेवावे. तथापि संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रक निर्गमित झाल्यानंतर कोणत्याही रकमा ठेव स्वरुपात ठेवता येणार नाहीत.

२. **स्थानिक स्वराज्य संस्था व प्राधीकरणे यांच्याकडील रक्कमा**

संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदा, नगरपालिका, महानगरपालिका, व प्राधिकरणे यांना एखाद्या आर्थिक वर्षात मुक्त केलेला व अखर्चित राहिलेला निधी लगतच्या पुढील आर्थिक वर्षाअखेरपर्यंत खर्च करण्याची अनुमती देण्यात आलेली आहे. त्यामुळे या संस्थांच्या बाबतीत दि. ३१ मार्च, २०१९ पुर्वी प्राप्त झालेला व सद्य:स्थितीत अखर्चीत असलेला शासकीय निधी शासनखाती जमा करणे आवश्यक राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००५२८१४२०४८१८०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.05.28 14:27:54 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. राज्यपालांचे सचिव
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
६. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र नागपूर
१४.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४०००0२
१५.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदर, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३. सर्व विभागीय आयुक्त
२४. सर्व जिल्हाधिकारी

२५. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

२७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती

२९. संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकण भवन, नवी मुंबई

३०. सह संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती

३१. वित्त विभागातील सर्व कार्यासने

३२. निवड नस्ती कोषा प्रशा-५.

## नमुना

## मुदत ठेव रकमेचा तपशील

**कार्यालयाचे नांव व आहरण व संवितरण अधिकारी क्रमांक**

| अनु. क्र. | कार्यालय / संस्था नाव | ठेव एकूण रक्कम | ठेव कालावधी | मॅच्युरिटी दिनांक | मॅच्युरिटी नंतरची एकूण रक्कम (मुद्दल + व्याज) | त्यापैकी शासकीय निधी रक्कम (मुद्दल + व्याज) | स्वनिधी रक्कम रक्कम (मुद्दल + व्याज) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **अ** | **आ** | **इ** | **ई** | **उ** | **ऊ (ऊ= ए + ऐ)** | **ए** | **ऐ** |
| **१)** | | | | | | | |
| **२)** | | | | | | | |
| **३)** | | | | | | | |
| **४)** | | | | | | | |

आहरण व संवितरण अधिकारी
स्वाक्षरी

**टिप** :-

१. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर माहिती देयकासोबत कोषागारांना सादर करावयाची आहे.

२. सर्व कोषागार कार्यालयांनी सदर माहितीचे एकत्रिकरण करुन शासन खाती जमा करण्यात आलेली रक्कम (कार्यालयाचे नांव, डिडिओ क्रमांक, एकूण जमा रक्कम इत्यादी तपशिलासह) व ठेव निधीबाबत उपरोक्त नमून्यातील माहिती दोन स्वतंत्र विवरणपत्रामध्ये संचालनालयास दि.२० जून, २०२० पर्यंत सादर करावी.